**वित्तीय वर्ष २०१५-१६**
**मुंबई इमारत दुरुस्ती व पुनर्रचना निधीत जमा करण्याकरिता महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरणाला अंशदानाची रक्कम वितरीत करण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**गृहनिर्माण विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः अर्थसं-१०१५/ प्र.क्र.८६/ दुवपु-२,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,**
तारीख: २० ऑक्टोबर,२०१५

वाचा --

१) वित्त विभागाचे परिपत्रक क्र. अर्थसं-२०१५/ प्र.क्र.८५/ अर्थसंकल्प-३, दि.१७.०४.२०१५

**प्रस्तावना --**

मुंबई शहर बेटावरील जुन्या व मोडकळीस आलेल्या उपकर प्राप्त इमारतींची दुरुस्ती/ पुनर्बाधणी करण्याकरिता महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास अधिनियम, १९७६ च्या कलम ८२ अन्वये मुंबई शहर बेटावरील उपकरप्राप्त इमारतींवर दुरस्ती उपकर आकारला जातो, तर कलम ८५ अन्वये बृहन्मुंबई महानगरपालिकेव्दारे उपकराची वसूली करण्यात येवून, वसुल करण्यात आलेला उपकर राज्याच्या एकत्रित निधीत जमा करण्यात येतो. दुरुस्ती उपकराची ही रक्कम विनियोजनान्वये, अर्थसंकल्पित करुन ती कलम ८६ नुसार मुंबई इमारत दुरुस्ती व पुनर्रचना निधीत वर्ग करण्यासाठी राज्य शासनाकडून हस्तांतरीत करण्यात येते. तसेच म्हाड अधिनियम, १९७६ च्या कलम ९७ अन्वये वसूल केलेल्या उपकराच्या रकमे इतकीच रक्कम शासनाकडून मुंबई शहर बेटावरील उपकरप्राप्त इमारतींच्या दुरुस्ती व पुनर्रचना कार्यक्रमासाठी महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरणास मुंबई इमारत दुरुस्ती व पुनर्रचना निधीत जमा करण्यासाठी शासकीय अंशदान म्हणून दिली जाते.

**शासन निर्णय--**

मुंबई शहरातील उपकरप्राप्त इमारतींच्या दुरुस्ती व पुनर्रचना कार्यक्रमासाठी महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरणाला मुंबई इमारत दुरुस्ती व पुनर्रचना निधीत जमा करण्याकरिता शासकीय अंशदानाच्या रकमेपोटी देण्यासाठी सन २०१५-१६ च्या अर्थसंकल्पात मागणी क्र.क्यु-३, २२१६ गृहनिर्माण, ८०,सर्वसाधारण, ८००,इतर खर्च, (००)(०२) मुंबई इमारत दुरूस्ती व पुनर्रचना निधीत जमा करण्यासाठी शासकीय अंशदान म्हणून महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरणाला रक्कम देणे (२२१६ ०५९२)- ३२,अंशदाने या लेखाशिर्षाखाली रूपये ३८,००,००,०००/- (रुपये अडतीस कोटी फक्त) इतकी तरतूद करण्यात आली आहे. वित्त विभागाने दि.१७.०४.२०१५ च्या परिपत्रकान्वये योजनेतर अर्थसंकल्पित तरतुदीच्या ७०% च्या मर्यादेत निधी वितरीत करण्यास सहमती दर्शविली आहे. मुंबई इमारत दुरुस्ती व पुनर्रचना मंडळ यांनी मागणी केल्यानुसार बृहन्मुंबई महानगरपालिकेद्वारा राज्याच्या एकत्रित निधीत जमा केलेल्या रु.१५.५६ कोटी इतक्या रकमेइतकी शासकीय अंशदानाची रक्कम उपरोक्त शीर्षाखालील अर्थसंकल्पित तरतुदीपैकी रुपये १५,५६,००,०००/-(रुपये पंधरा कोटी छप्पन्न लक्ष फक्त) इतकी तरतूद वित्त नियंत्रक, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरणास वितरीत करण्यास या शासन निर्णयाव्दारे मान्यता देण्यात येत आहे.

वित्त नियंत्रक, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण यांनी महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास अधिनियम, १९७६ च्या कलम ८६ नुसार सदर रक्कम मुंबई इमारत दुरूस्ती व पुनर्रचना मंडळास उपलब्ध करून द्यावी.

सदर निधी मुंबई इमारत दुरूस्ती व पुनर्रचना मंडळाच्या अधीनस्त असल्याने वरील निधी खर्च करताना वित्त विभागाच्या दि.१७.०४.२०१५ च्या परिपत्रकातील अटींची पूर्तता करण्याची जबाबदारी मुख्य लेखाधिकारी, मुंबई इमारत दुरूस्ती व पुनर्रचना मंडळ यांची राहील.

२. अंशदानाची रक्कम **रुपये १५,५६,००,०००/-(रुपये पंधरा कोटी छप्पन्न लक्ष फक्त)** महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरणास, शासनाच्या गृहनिर्माण विभागाचे अवर सचिव तथा आहरण व संवितरण अधिकारी यांनी प्रतिस्वाक्षरीत केलेले देयक, प्राधिकरणाने सादर केल्यानंतर वितरीत करण्यात यावी.

३. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या दि.१७.०४.२०१५ च्या परिपत्रकातील दिलेल्या सुचनांनुसार व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. क्र. ४३९/व्यय-३, दि.०९.१०.२०१५ अन्वये देण्यात आलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५१०२११६२९३१७००९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Jayant Vasant Wani

Digitally signed by Jayant Vasant Wani
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Desk Officer, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=bff25e350ea9446cc7f3b43987f8ffe247e43e10915a7723e889fcc11e2f43eb, cn=Jayant Vasant Wani
Date: 2015.10.21 16:31:44 +05'30'

**(जयंत व. वाणी)**
कक्ष अधिकारी, गृहनिर्माण विभाग

**प्रत,**

१) उपाध्यक्ष व मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण, गृहनिर्माण भवन, वांद्रे (पूर्व), मुंबई-५१.
२) मुख्य अधिकारी, मुंबई इमारत दुरुस्ती व पुनर्रचना मंडळ, गृहनिर्माण भवन, वांद्रे (पूर्व), मुंबई-५१.
३) प्रधान महालेखपाल, महाराष्ट्र-१ (लेखा परिक्षा), मुंबई,
४) महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा व अनुज्ञेयता), नागपूर
५) वित्त नियंत्रक, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण, गृहनिर्माण भवन, वांद्रे (पूर्व), मुंबई-५१.

६) मुख्य लेखाधिकारी, मुंबई इमारत दुरुस्ती व पुनर्रचना मंडळ, गृहनिर्माण भवन, वांद्रे (पूर्व), मुंबई-५१.
७) संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, संगणक शाखा, मुंबई
८) अधिदान व लेखाधिकारी, नवीन प्रशासकीय भवन, वांद्रे कुर्ला संकुलन, मुंबई-५१ (२ प्रती)
९) अवर सचिव (लेखा कार्यासन) गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१०) वित्त विभाग(व्यय-३ कार्यासन) (अर्थोपाय कार्यासन)(अर्थ-१७), मंत्रालय, मुंबई-३२
११) अवर सचिव (अर्थसंकल्प-१/ रोखशाखा) गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण, गृहनिर्माण भवन, वांद्रे (पूर्व), मुंबई-५१.
१३) निवड नस्ती (दुवपु-२ कार्यासन) गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.